पाटबंधारे प्रकल्पांच्या सिंचन व बिगरसिंचन पाणीपट्टीतून प्राप्त होणा-या रकमेतून देखभाल दुरुस्ती कामासाठी खर्च करण्याच्या कार्यपध्दतीबाबत मार्गदर्शक सूचना

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन परिपत्रक क्र.संकीर्ण-२०१६/प्र.क्र.८८/१६/सिंव्य (कामे)**
**मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.**
**दिनांक :-१४.०६.२०१८**

**संदर्भ :-** १) शासन निर्णय क्र.देवदु-२०१५/(८३६/२०१५)सिंव्य (कामे),दि.१७.११.२०१६
(संगणक संकेतांक २०१६१११७१७२४५७२६२७)
२) शासन निर्णय क्र.संकीर्ण-२०१६/(८८/२०१६) सिंव्य (कामे),दि.०९.०५.२०१६
(संगणक संकेतांक २०१६०५०९१७१३०५६४२७)
३) शासन परिपत्रक क्र.बीजीएम-२०१६/(२४१/२०१६) अर्थ-२ , दि.२९.११.२०१६
(संगणक संकेतांक २०१६११२९१७५१४८८३२७)
४) शासन परिपत्रक क्र.बीजीएम-२०१६/(२४१/२०१६) अर्थ-२ , दि.३०.०३.२०१७
(संगणक संकेतांक २०१७०३३०१५३१०४०५२७)
५) शासन निर्णय क्र.देदु-२००७/(७५५/२००७) सिंव्य (कामे) , दि.११.०२.२००८
(संगणक संकेतांक २००८०२१११३११३२००१)
६) शासन निर्णय क्र.संकीर्ण-२००७/(१३/२००७) सिंव्य (कामे) , दि.२७.०८.२०१३
(संगणक संकेतांक २०१३०८२७१३१५१२८२२७)
७) शासन परिपत्रक क्र.देदुप्र-२००१/(२७४/२००१) सिंव्य (कामे) , दि.०२.०७.२००२
(संगणक संकेतांक २०१४१२१७१३२१५४४५२७)

**पार्श्वभूमी:-**

राज्यातील विदर्भ,तापी,गोदावरी, कोकण व कृष्णा या महामंडळांच्या अधिनियमांमध्ये त्यांच्या कार्यक्षेत्रातील नवीन प्रकल्पांची बांधकामे आणि पूर्ण झालेल्या प्रकल्पांचे सिंचन व्यवस्थापन करणेची तरतूद आहे. (कलम १८ व १९) त्यानुसार संदर्भीय शासन निर्णयाप्रमाणे सिंचन व्यवस्थापनाचे काम व संबंधित कार्यालये महामंडळाच्या अधिनियमातील तरतूदीनुसार वर्ग करण्यात आलेली आहेत. तसेच महामंडळातंर्गत सिंचन प्रकल्पांतून मिळणा-या पाणीपट्टीची रक्कम सिंचन व्यवस्थापनाच्या कामासाठी खर्च करण्यास पाटबंधारे विकास महामंडळांना मान्यता दिलेली आहे. तसेच उपरोक्त संदर्भ क्र.२ ते ४ मध्ये नमूद शासन निर्णय / परिपत्रकान्वये सिंचन प्रकल्पांच्या देखभाल दुरुस्तींची कामे करण्याबाबत महामंडळाकडे जमा होणा-या पाणीपट्टी रकमेचा विनियोग / वितरण /लेखा प्रणालीबाबत व सिंचन व्यवस्थापनाची दिनांक १७.११.२०१६ पूर्वीची देखभाल दुरुस्तीची प्रलंबित देयके अदा करण्याबाबत सूचना निर्गमित करण्यात आल्या आहेत. देखभाल दुरूस्तींच्या कामांची देयके अदा करताना पारदर्शकता राखण्याच्या दृष्टिकोनातून तसेच देयकाच्या अदायगीवेळी भेदभाव होवू नये यासाठी देखील सूचना निर्गमित करणे आवश्यक आहे.

पाणीपट्टीच्या रकमेतून सिंचन व्यवस्थापनाची कामे तसेच देखभाल दुरुस्तीची कामे करणेची कार्यपध्दती महामंडळांनी तयार केलेली आहे. तसेच देखभाल दुरुस्तीची कामे हाती घेण्यासंदर्भात उपरोक्त संदर्भात नमूद केल्यानुसार विविध मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत. तथापि याबाबत अधिक सविस्तर सूचना देणे व कार्यपध्दतीमध्ये एकसूत्रता व एकवाक्यता येण्याच्या दृष्टीने मार्गदर्शक सूचना निर्गमित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुसार पुढीलप्रमाणे मार्गदर्शक सूचना देण्यात येत आहेत.

**<u>शासन परिपत्रक :-</u>**

१) शासन निर्णय दि.९.५.२०१६ मधील मुद्दा क्र. ३,४ व ५ कडे पुनश्च लक्ष वेधण्यात येत आहे. यासंदर्भात प्रापण सूची मंजूर करतेवेळी घ्यावयाच्या दक्षताबाबत पुढीलप्रमाणे सविस्तर सुचना देण्यात येत आहेत.

**अ)** कार्यकारी संचालक यांनी वर्षभरात प्राप्त होणा-या बिगर सिंचन रकमेतून संभाव्य किती रक्कम देऊ शकतो हे मंडळनिहाय (शक्य असल्यास प्रकल्पनिहाय) ३१ मे अखेरपर्यंत कळवावे. महामंडळ स्तरावरुन अशी रक्कम कळविताना आस्थापना खर्च परतावा ,उपसा सिंचन योजना , वीज देयके ,विशेष दुरुस्तीसाठीचा खर्च,अन्य अनिवार्य खर्च या रकमा वजा करुन उर्वरित रक्कमच मंडळस्तरावर देखभाल दुरुस्ती करण्यासाठी उपलब्ध होईल असे कळवावे.

**आ)** महामंडळाने पाणीपट्टीद्वारे प्राप्त होणा-या वार्षिक महसूलापेक्षा अधिकचे रक्कमा कळवू नयेत.महामंडळाकडे प्राप्त झालेल्या रक्कमांची मागील तीन वर्षाची सरासरी व बिगर सिंचन दरवाढीमुळे होणारी संभाव्यवाढ धरुन एकूण महसूलाची रक्कम परिगणित करावी.

**इ)** सिंचन पाणीपट्टीची रक्कम देखभाल दुरुस्तीसाठी त्याच प्रकल्पावर खर्च करणे अपेक्षित आहे. यासाठी सर्वप्रथम प्रकल्पनिहाय वसूल होणारी संभाव्य पाणीपट्टीची रक्कम अधीक्षक अभियंता यांनी निश्चित करावी.

यासाठी साधारणपणे मागील तीन वर्षात वसूल झालेल्या पैकी सर्वात जास्त रक्कम , संभाव्य वसूली म्हणून धरावी. तसेच सिंचन पाणीपट्टीतील दरवाढीमुळे अधिकची रक्कम वसूल होणार असल्यास ,दरवाढीचे प्रमाणात (तेवढयाच टक्केवारीने) ,वसूली वाढेल असे गृहीत धरुन सदर रक्कम परिगणित करण्यात यावी.ही कार्यवाही अधिक्षक अभियंता यांनी ३० जूनपर्यंत पूर्ण करावी.

**उ)** अधीक्षक अभियंता यांनी प्रापण सूची प्रकल्पनिहाय मंजूर करावी. प्रकल्प याचा अर्थ ज्यासाठी स्वतंत्र प्रशासकीय /सुधारीत प्रशासकीय मान्यता आहे तो प्रकल्प म्हणून गृहीत धरावे. (विस्तार व सुधारणा तसेच विशेष दुरुस्तीचे प्रमा/सुप्रमा सोडून) सदर प्रापण सूची मंजूर करताना निविदा

निश्चितीचे घटक लक्षात घेवून करावे,जेणे करुन निविदा करताना पुन्हा दर कमी करण्याची वेळ येवू नये.

**ऊ)** बिगर सिंचन पाणीपट्टीतून करावयाच्या देखभाल दुरुस्तीच्या कामासाठी प्रकल्पनिहाय /मंडळनिहाय किती रक्कम उपलब्ध होणार आहे. याची माहिती अधिक्षक अभियंता यांनी कार्यकारी संचालकांकडून ३१ मे पर्यंत प्राप्त करुन घ्यावी. अशी माहिती उपलब्ध न झाल्यास मागील आर्थिक वर्षात प्रत्यक्ष प्राप्त निधी इतकी रक्कम नियोजनासाठी गृहीत धरावी.

**ए)** बिगर सिंचन पाणीपट्टीतून मागील आर्थिक वर्षामधील थकित देयके अदायगीसाठी ५०% रक्कम किंवा प्रत्यक्ष थकीत देयके रक्कम यापैकी जी कमी असेल ती मागील थकीत देयके अदायगीसाठी राखीव ठेवावी. उर्वरित रक्कम नवीन आर्थिक वर्षासाठी उपलब्ध आहे असे समजावे.

**ऐ)** वरील "ए" येथे नमूद केल्याप्रमाणे उपलब्ध होणारी रक्कम प्रकल्पातील पाणीसाठा , सिंचन क्षमता , धोकेदायक बांधकामांची दुरुस्ती, दुरुस्तीनंतर कार्यक्षमतेत होणारी वाढ ,प्रकल्पास सिंचन पाणीपट्टीतून मिळणारी रक्कम इत्यादी बाबी लक्षात घेवून सदर रक्कमांचे प्रकल्प निहाय खर्चासाठी वाटप अधिक्षक अभियंता यांनी निश्चित करावे. यात सर्व प्रकल्पांचा (मोठे, मध्यम, लघु,को.प.बंधारे,उसियो इत्यादी ) समावेश करावा.

**ओ)** अनुक्रमे "ऐ" मध्ये निश्चित केलेली (प्रकल्पनिहाय) बिगर सिंचन पाणीपट्टीमधून उपलब्ध होणारी रक्कम व अनुक्रमे "इ" मध्ये निश्चित केलेली सिंचन पाणीपट्टीतून उपलब्ध होणारी रक्कम अशी एकत्रित रक्कम प्रकल्प निहाय उपलब्ध होईल. या रकमेतून ९०% मर्यादेपर्यंत प्रकल्पनिहाय प्रापणसूची मंजूर करावी व उर्वरित १०% रक्कम आकस्मिक बाबी उद्भवल्यास त्या कामासाठी राखीव ठेवावी.

**औ)** आकस्मिक कामात कालवा फुटणे व बांधकाम पडणे अशा अचानक निर्माण होणा-या बाबींचा समावेश असेल.

**क)** "ओ" येथे नमूद केलेल्या निधीपेक्षा जादाचे / अतिरिक्त दायित्व निर्माण झाल्यास त्यास प्रापण सूची मंजूर करणारा अधिकारी जबाबदार असेल.

**ख)** ज्या प्रकल्पावर सिंचन होणार नसेल त्यात प्रापण सूची मंजूर करताना गाळ ,गवताची कामे करुन नयेत टिकाऊ स्वरुपाची म्हणजे बांधकाम दुरुस्तीची, आवश्यक तेथे अस्तरीकरण , गळती दुरुस्ती इत्यादी कामे करावीत. मातीकाम यांत्रिकी संघटनेकडून करावे.

**२)** शासन निर्णय दिनांक ११.०२.२००८ मध्ये पाटबंधारे प्रकल्पांच्या देखभाल दुरुस्तींची कामे करताना निविदा काढताना धरावयाचे घटक यासंदर्भात सूचना दिलेल्या आहेत. त्याकडे पुनश्च लक्ष वेधण्यात येत आहे. निविदा काढताना याचे काटकोरपणे पालन करावे.

**अ)** प्रकल्पांच्या घटकांची विभागणी उपरोक्त शासन निर्णयात नमूद केली आहे. ती तशीच ठेवावी.

**आ)** देखभाल दुरुस्तीच्या कामांच्या निविदा त्या त्या वर्षी प्रापण सूची मंजूरीनंतर लगेच निश्चित करावी. त्यांची एकूण किंमत त्या त्या प्रकल्पांवर प्राप्त होणा-या एकूण महसूलापेक्षा जास्त नसाव्यात.
**इ)** घटक निहाय निविदा काढण्यासाठी मंजूर प्रापण सूचीतील कामांचे घटकनिहाय एकत्रिकरण करुन निविदा काढावी.

**३)** देखभाल दुरुस्तीच्या कामांची देयके अदा करण्याबाबत शासन निर्णय दि.३०.०५.२०१७ अन्व्ये मार्गदर्शक सूचना निर्गमित केल्या आहेत. त्याकडे पुनश्च लक्ष वेधण्यात येत आहे.

**अ)** देयके अदा करण्यास पारदर्शकता आणण्याच्या दृष्टीने देखभाल दुरुस्तीच्या कामांची देयके विभागात प्राप्त होताच त्याची स्वतंत्र नोंदवही विभागीय लेखाधिकारी यांनी ठेवावी. तसेच निविदा कालावधी संपल्यानंतर एका महिन्याचे आत अंतिम देयक प्राप्त करुन घेण्याची जबाबदारी विभागीय लेखापाल यांची असेल. ज्या शाखा / उप विभागाकडून सबल कारणाशिवाय देयके सादर केली जात नसल्यास , अशा बाबी अधिक्षक अभियंता व मुख्य अभियंता यांना गोपनीय पत्राद्वारे लेखाधिकारी यांनी निदर्शनास आणावी.

**आ)** प्रलंबित देयके व चालू वर्षातील देयके नोंदवहीतील अनुक्रमांकानुसारच देयकांची अदायगी करावी. अपवादात्मक परिस्थितीत अनुक्रम बदलावयाचा झाल्यास तसे कारणंसह प्रस्ताव अधिक्षक अभियंता यांना पाठवून त्यांच्याकडून देखील मंजूरी प्राप्त झाल्यानंतरच देता येईल. अशी मंजूरी देताना अधिक्षक अभियंता यांनी नमूद केलेली कारण मीमांसाची स्वतंत्रपणे खात्री करुन तसे आदेशामध्ये लेखी नमूद करुन कार्यकारी अभियंता यांस कळवावे.

**इ)** कंत्राटदाराच्या देयकावरील शेरे पूर्तता करुन घेणे ही विभागीय कार्यालयाची जबाबदारी असेल. शेरे पूर्ततेअभावी देयके प्राप्त होण्याचा क्रम खाली करु नये. अनुक्रमांक तोच राहील.

**ई)** अदायगी करताना नोंदवहीतील अनुक्रमांचे पालन करणे ही विभागीय लेखापाल व कार्यकारी अभियंता यांची जबाबदारी असेल. देयकांची अदायगी शक्यतो त्याच आर्थिक वर्षात करावी. देखभाल दुरुस्तीची कामे सिंचन व्यवस्थापन चांगले व कार्यक्षम सिंचन होण्यासाठी करण्यात येत असल्यामुळे व दरवर्षी पावसाळयानंतर नव्याने करावे लागत असल्याने सिंचन वर्ष संपताच अशी कामे शक्यतो आहे त्या स्थितीत अंतिम करावीत.

**उ)** देयके अदायगीमध्ये पारदर्शकता आणण्यासाठी महामंडळाने पतपत्र मंडळ कार्यालयास दिल्यानंतर अधिक्षक अभियंत्यांनी ७ दिवसात पतमर्यादा विभागाला वर्ग करावी. त्यानंतर विभागाने ७ दिवसात कंत्राटदारास देयके अदायगी करावी. याबाबत ज्या स्तरावरुन विलंब होईल त्या कार्यालयातील संबंधित अधिकारी व कर्मचारी जबाबदार असतील.

सदर परिपत्रकातील मार्गदर्शक सूचनांची अंमलबजावणी शासन परिपत्रकाच्या दिनांकापासून करण्यात यावी.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून, त्याचा संकेतांक २०१८०६१४१३०५२५३०२७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने.

Atul Ashok Kapole

Digitally signed by Atul Ashok Kapole
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=797fcfe0bb4a86dd814129f50d05c1d249ea6f0acc364c6214f11ff7174bd5ef, serialNumber=ae2c4f4c985d3e984de94324901263d48766ec651dea49d652faf11a96aa98b5, cn=Atul Ashok Kapole
Date: 2018.06.14 13:05:58 +05'30'

**(अ.अ.कपोले)**
शासनाचे उप सचिव

**प्रत,**

१. मा.मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
२. मा.राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव,मंत्रालय,मुंबई
३. प्रधान सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई
४. सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,मंत्रालय,मुंबई
५. सर्व कार्यकारी संचालय,जलसंपदा विभाग
६. सर्व मुख्य अभियंता, जलसंपदा विभाग
७. सर्व अधिक्षक अधिक्षक अभियंता, जलसंपदा विभाग
८. आंतरवित्त सल्लागार व उप सचिव,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई
९. सर्व कार्यकारी अभियंता,जलसंपदा विभाग
१०. सिंव्य कामे संग्रहार्थ